# वाऱ्याचा आवाज

## डॉ. ग्रेग आणि “थ्री कप्स ऑफ टी”ची गोष्ट

लेखक: डॉ. ग्रेग मॉर्टेन्सन/सुझान रोथ
कोलाज: सुझान रोथ
मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक



आम्ही आहोत कोरफे गावातील मुले.

अगदी काही वर्षापूर्वीपर्यंत आम्ही निसर्गाच्या शाळेत शिकत होतो. आम्ही काडीने धुळीत अक्षरे गिरवायचो.

पण एक दिवस आमच्या गावात डॉ. ग्रेग आले आणि त्यांनी वाऱ्याचा आवाज ऐकला....



डॉ. ग्रेग मॉर्टेन्सन यांनी पाकिस्तानात बांधलेल्या पहिल्या शाळेची ही गोष्ट आहे. त्याच्या अविस्मरणीय अनुभवावर आधारलेली ‘थ्री कप्स ऑफ टी’, ‘वन मॅनस मिशन टू प्रमोट पीस’ ,’वन स्कूल ॲट अ टाईम’ ही पुस्तके न्यूयॉर्क टाईम्स बेस्टसेलर आहेत व त्यांच्या १२ लाखापेक्षा जास्त प्रती विकल्या गेल्या आहेत.

# वाऱ्याचा आवाज

## डॉ. ग्रेग मॉर्टेन्सन आणि "थ्री कप्स ऑफ टी" ची गोष्ट

लेखक: डॉ. ग्रेग मॉर्टेन्सन/सुझान रोथ
कोलाज: सुझान रोथ
मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक



आम्ही कोरफे गावातील मुले आहोत. आमचे गाव पाकिस्तानातल्या पहाडी भागात आहे. आमचे आई-बाबा शेतात कष्ट करून जे पिकवतात ते अन्न आम्ही खातो. आमच्या आयांनी शिवलेले/विणलेले कपडे आम्ही वापरतो. आमचे खेळ, खेळणी आम्हीच तयार करतो. वाचण्यासाठी आम्हीच पुस्तके तयार करतो आणि आम्हीच बनवलेल्या पेन्सिलीने लिहितो. आम्ही ज्या शाळेत शिकत आहोत ती शाळाही आम्हीच बांधली आहे.

आमच्या गावात शाळा नव्हती तेव्हा आमची शाळा उघड्यावर भरायची. काडीने आम्ही जमिनीत अक्षरे गिरवायचो.





आणि एके दिवशी आमच्या गावात एक अनोळखी इसम आला. थंडी आणि भुकेने ते पूर्ण गळून गेले होते. त्यांना आम्ही उबेसाठी शेकोटीजवळ बसवले आणि गरमागरम चहानाश्ता खायला दिला.

त्यांनी आपले नाव सांगितले ग्रेग मॉर्टेन्सन. ते रुग्णांची सेवा करण्याचे काम करायचे. ते अमेरिकेतून गिर्यारोहणासाठी आले होते पण वाटेत कुठे तरी भरकटले गेले होते.

त्यांच्या तब्येतीत सुधारणा झाल्यावर त्यांनी आमच्या आजारी लोकांची शुश्रुषा करायला सुरुवात केली. आम्ही सगळे त्यांना डॉ. ग्रेग म्हणू लागलो.

कधीकधी ते बाहेर बसून आम्हाला शिकवायला मदत करायचे. आमचे शिक्षक आठवड्यातून फक्त तीन वेळा यायचे परंतु आम्ही अभ्यास मात्र रोज करायचो हे त्यांना माहीत होते.






डॉ. ग्रेगनी खडखडीत बरे झाल्यावर आपल्या घरी परत जायचे ठरवले. जाताना त्यांनी गावातील विद्वान व्यक्ती हाजी अली ह्यांच्यापाशी कोरफे गावासाठी मला कृतज्ञता म्हणून काहीतरी विशेष काम करायचे आहे अशी इच्छा व्यक्त केली.

हाजी अलीनी त्यांना सांगितले, “डोळे बंद करा आणि अगदी नीट वाऱ्याचा आवाज ऐका.”

डॉ. ग्रेगनी डोळे बंद केले. आम्ही मुले एका उंच ठिकाणी सपाट माळरानावर आमचे अभ्यासाचे धडे वाचत होतो. आमचा आवाज वाऱ्याबरोबर खालपर्यंत जात होता. त्यांना आमचा आवाज ऐकू गेला. त्यांच्या चेहऱ्याला गार वाऱ्याची झुळूक स्पर्श करून गेली आणि गावाला काय हवे हे त्यांना कळले.

कोरफे गावाला शाळेची खूप गरज होती. डॉ. ग्रेगनी वचन दिले की ते शाळेसाठी मदत करण्यासाठी लवकरच  परत येतील.

आणि मग त्यांनी निरोप घेतला. ते डोंगरांगातून दिसेनासे होईपर्यंत आम्ही त्यांना टाटा करत होतो.



एक वर्ष सरले. गावाकडे येणाऱ्या घाटाच्या रस्त्यावरून आम्हाला एक माणूस चालत येताना दिसला. ते डॉ. ग्रेग होते. आम्ही सगळे मुले त्यांना भेटण्यासाठी पळत खाली निघालो.

जवळच्या स्कार्डू ह्या तालुक्याच्या ठिकाणी जाऊन त्यांनी शाळा बांधण्यासाठी लाकडे, सिमेंट, हत्यारे जमा केली. पण अडचण अशी होती की आमच्या गावाकडे येणाऱ्या ब्रायडू नदीवर पूल नव्हता. दोन डोंगर एका केबलने जोडले होते. त्याला एक खोका बांधला होता व त्यातून एका वेळी फक्त एक माणूस येऊ शके.



म्हणून मग सगळ्या गावकऱ्यांनी एकत्र येऊन पहिल्यांदा नदीवर पूल बांधला.

पूल पूर्ण व्हायला बरेच महिने लागले. त्यानंतर डॉ. ग्रेग आणि मोठ्या माणसांनी शाळेसाठी लागणारे सगळे साहित्य ह्या नवीन मजबूत पुलावरून वाहून आणले.

उंच डोंगरावर एका ठिकाणी आम्ही दगडांचा डोंगर रचून ठेवला होता. त्या उंच जागेपर्यंत सगळ्यांनी सामान वर उचलून आणले.



हाजी अलीनी शाळेची इमारत कुठे उभारायची ती जागा नक्की केली. आमच्या आया इमारत बांधण्यासाठी सिमेंट आणि पाणी ह्यांचे मिश्रण करू लागल्या तर बाबा मंडळी भिंती बांधण्यासाठी लागणारे दगड वाहून आणू लागले.

आमच्या छोट्या हातांनी आम्ही भिंत मजबूत होण्यासाठी छोटी खडी सिमेंटमध्ये कालवली. ज्या जागेवर आम्ही काडीने अक्षरे लिहीत होतो तिथे आता शाळेच्या मोठ्या भिंती आकाराला येऊ लागल्या.



सगळ्यात शेवटी छत चढवण्यात आले. सगळ्यांनी डॉ. ग्रेगना शेवटचा खिळा ठोकण्याची विनंती केली.

व्वा!!! शाळा तयार झाली!

सगळेच आनंदाने नाचू लागले.



उद्‌घाटनाच्या दिवशी आमचे इमाम शेर ताखी, आदरणीय हाजी अली, आमचा शिक्षक हुसेन, डॉ. ग्रेग, शाळेसाठी खूप सारी पुस्तके घेऊन येणारी लायब्ररीयन जुलिया, कारागीर, कामगार, मजूर, कोरफे गावातील आबाल-वृद्ध आणि अगदी आमचे याक, खेचरे, बकऱ्या, मेंढ्या सगळ्या सगळ्यांची वरात शाळेच्या दिशेने निघाली.



शेर ताखीनी शाळा सुरु होण्याआधी प्रार्थना केली.

आम्ही हुसेनबरोबर शाळेच्या इमारतीत
पळत शिरलो. तो आता आम्हाला रोज
शिकवायला येणार होता.



आम्ही कोरफे गावातील मुले आहोत. आमचे गाव पाकिस्तानातल्या पहाडी भागात आहे. आम्ही उर्दू आणि इंग्रजी लिहायला-वाचायला शिकतो आहोत. आम्ही गणितातल्या संकल्पना समजून घेतोय. आम्ही पुस्तके वाचतोय. नकाशाचे वाचन करतोय. आम्ही मिळून बांधलेल्या शाळेत आम्ही शिकतो आहोत.

आम्ही कोरफे गावातील मुले आहोत. तुम्हाला आमचा आवाज ऐकू येतो आहे ना!

वाऱ्याचा आवाज कान देऊन ऐका..............





ही खरी घटना आहे. डॉ. ग्रेग मॉर्टेन्सन हे खरे व्यक्ती होते.



आणि ही कोरफेची मुलेही खरी आहेत बर का..'.



पाकिस्तान हा आशिया खंडातील एक देश आहे




आणि बाल्टिस्तान हा पाकिस्तानमधील एक भाग आणि कोरफे, बाल्टिस्तानमधील एक छोटेसे खेडे.



विद्वान व्यक्ती - हाजी अली ज्यांनी ग्रेगना "वाऱ्याचा आवाज ऐका' असे सांगितले.



हा ब्रायडू नदीवर बांधलेला पूल. २८४ मीटर लांबी व नदीच्या ६० फुट उंच.



कोरफे गाव हे काराकोरम पर्वतरांगांमध्ये वसले आहे.



कोरफेच्या लोकांनी हे अवजड सामान शाळेच्या ठिकाणापर्यंत १८ मैल वाहून आणले. शेर ताखी सर्वात पुढे होते. ते आमच्या गावाचे आध्यात्मिक गुरु, मार्गदर्शक आणि इमाम आहेत.
शेर ताखी ह्यांचे सहाय्य खूप महत्वाचे होते कारण इतर धर्मगुरू अशी मेहनतीची कामे करीत नाहीत.



कोरफेतील काही मुले आणि पुरुष
भिंतीचे काम करताना



कोरफे शाळेची पूर्ण बांधून
झालेली इमारत



शाळेचा उद्घाटन दिवस -१० डिसेंबर १९९६. डॉ. ग्रेग मेजवानीच्या जेवणासाठी मदत करताना



लायब्ररीयन जुलिया बर्गमननी शाळेचे शिक्षक हुसेन ह्यांना शाळेची लायब्ररी बनवण्यासाठी मदत केली

डॉ. ग्रेगनी सर्वात पहिल्यांदा कोरफे शाळा बांधण्यासाठी मदत केली. त्यानंतर त्यांनी पाकिस्तान आणि अफगाणीस्तानात अजून ५७ शाळा बांधल्या. खालची हुशेतील शाळा आहे. जूलिया बर्गमननी इथेही लायब्ररी बनवली. टीचर्सना ट्रेनिंग दिले. आज ह्या शाळांमध्ये जवळजवळ चोवीस हजार मुले शिकत आहेत.





शाळेसाठी भरपूर मदत लागते. खूप जण शाळेला विविध प्रकारे मदत करतात. डॉ. ग्रेग व जॉन होरेन ह्यांनी सुरु केलेली “सेन्ट्रल एशिया इन्स्टिट्यूट” ही संस्था खूप मदत करते.



जगभरातील छोटी मुले एकेक पेनी (पैसा) गोळा करून मदत पाठवतात. अमेरिकेत एका पेनीमध्ये काहीही येत नाही पण पाकिस्तान आणि अफगाणिस्तानात मात्र त्यात पेन्सिल विकत मिळते आणि त्यांच्या एका डॉलरमध्ये एका मुलाच्या महिन्याचा खर्च निघतो. जर तुम्हाला शाळा बांधण्यासाठी काही पैसे पाठवून मदत करायची असेल तर “पेनीज फॉर पीस”- penniesforpeace.org इथे संपर्क करा.

